संगणक सांकेतांक क्र : 202007071053521413

कोविड -१९ उपाययोजनेतंर्गत खाजगी आस्थापना व अन्य आस्थापनेत कार्यरत मनुष्यबळाच्या कोविड -१९ चाचण्या करण्यासंदर्भात कार्यवाही करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग ,**
शासन निर्णय क्रमांक : कोविड -२०२०/प्र.क्र. २०६ / प्रशा -१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०६ जुलै , २०२०.

वाचा :-
१. शासन परिपत्रक , वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, संकीर्ण २०२० / प्र.क्र. २७ / औषधे -२, दिनांक २३ जून २०२०
२. सचिव, आरोग्य व कुंटुंब कल्याण तसेच सचिव, आरोग्य संशोधन तथा महासंचालक, भारतीय आयुर्विज्ञान संशोधन परिषद, (आयसीएमआर ) नवी दिल्ली यांचे संयुक्त स्वाक्षाकिंत पत्र दिनांक ०१.०७.२०२०

सध्या सर्वत्र पसरलेलया कोविड -१९ संसर्गजन्य आजाराच्या अनुषंगाने विविध उपयायोजना केल्या जात आहेत. त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या मार्फत वेळोवेळी विविध स्वरूपाच्या मागदर्शक सूचना / निर्देश निर्गमित करण्यात येत असतात. याविषयी राज्यामध्ये कोविड -१९ उपाययोजनेतंर्गत कोविड -१९ चाचण्यांचे बळकटीकण करणेबाबत उपरोक्त दिनांक २३.०६.२०२० च्या शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गर्मित करण्यात आलेल्या आहेत. याविषयी उपरोक्त नमूद केंद्र शासनाच्या दिनांक ०१.०७.२०२० च्या पत्रातील निर्देश पहाता, Track -Test - Trace - Isolate या कार्यप्रणालीद्वारे कोविड -१९ या संसर्गजन्य आजाराचे तात्काळ निदान व प्रतिबंध करणेबाबत कार्यवाही करणे शक्य असल्याने जास्तीत जास्त कोविड -१९ चाचण्या होणे आवश्यक असल्याने याबाबत उपायोजना करावयाच्या आहेत. याविषयी राज्यातील खाजगी व अन्य आस्थापनांमध्ये कार्यरत असणाऱ्या मनुष्यबळांच्या एकत्रित कोविड -१९ चाचण्या करण्यास परवानगी मिळणेबाबत संबंधित खाजगी वा तत्सम आस्थापनांकडून वारंवार विचारणा होत असते. त्यानुषंगाने याबाबत ज्या खाजगी वा तत्सम आस्थापनांना त्यांच्या कार्यालयातंर्गत कार्यरत मनुष्यबळांच्या कोविड चाचण्या करावयाच्या असतील अशा आस्थापनांना खालील तरतूदींच्या अधीन राहून कोविउ -१९ चाचण्या करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. संबंधित आस्थापनेतील किमान ५० कर्मचाऱ्यांच्या चाचण्या करून घेणे आवश्यक राहील.

२. संबंधित आस्थापनेचा प्रमुख वा त्याने सदर चाचणींसाठी नियुक्त केलेला प्राधिकारी ग्रामीण व शहरी भागाच्या संदर्भात संबंधित जिल्हाधिकारी व महानगर क्षेत्राच्या बाबतीत संबंधित महानगरपालिका आयुक्त यांच्याकडे यासंदर्भात अर्ज सादर करील.

३. सदर अर्जात प्रस्तावित करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांची कोविड -१९ चाचणी कोणत्या प्रणालीद्वारे ( आरटीपीसीआर, ट्रु नॅट, सीबीनॅट, ॲण्टीबॉडी, ॲन्टीजेन इत्यादी ) व कोणमार्फत करण्यात येणार आहे याबाबतचा स्पष्ट उल्लेख अर्जामध्ये करतील.

४. संबंधित आस्थापनेने त्यांच्या अर्जात नमूद केलेल्या चाचणी प्रयोगशाळेची चाचणी क्षमता किती आहे. सदर प्रयोगशाळेत शासकीय यंत्रणेमार्फत किती नमूने चाचणीसाठी पाठविलेले जातात याची माहिती संबंधितांनी घ्यावी. तदनंतर शासकीय नमुन्यांच्या संख्ये व्यतिरीक्त उर्वरीत चाचणी क्षमतेच्या मर्यादेतच खाजगी आस्थापनांनी अर्जात नमूद केलेल्या संबंधित प्रयोगशाळेस खाजगी आस्थापनांनी प्रस्तावित केलेल्या कर्मचाऱ्यांच्या चाचण्या करणेबाबत मान्यता प्रदान करावी.

५. कोविड -१९ चाचण्याबाबतचे संबंधित कर्मचाऱ्याचे चाचणीबाबतचे Positive (+ve ) व Negative (-ve) अहवाल भारतीय आयुर्विज्ञान संशोधन परिषदेच्या मानकांप्रमाणे / मागदर्शक सूचनांप्रमाणे आयसीएमआर संस्थेस कळवावेत. तसेच सदर चाचण्यांच्या अहवालाबाबतची माहिती जिल्हाधिकारी, महापालिका आयुक्त , सार्वजनिक आरोग्य विभाग यांनी वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार संबंधितास उपलब्ध करून द्यावी.

६. सदर चाचण्यांच्या अनुषंगाने कोविड -१९ Positive (+ve ) असलेल्या रुग्णांना विहीत निकषाप्रमाणे व कार्यपध्दतीनुसार पुढील उपचारास्तव अलगीकरण कक्षाकडे पाठविण्याबाबत तसेच त्यांच्या संपर्कातील व्यक्तींना Institutional Quarantine मध्ये पाठविणेबाबत संबंधित आरोग्य विषयक यंत्रणेशी समन्वय साधून आवश्यक कार्यवाही करण्याची जवाबदारी संबंधित खाजगी वा तत्सम आस्थापनेच्या महा व्यवस्थापक वा त्यांनी याविषयी प्राधिकृत केलेल्या व्यक्तीची राहील.

७. याविषयी विहीत कार्यपध्दतीनुसार कार्यवाही न झाल्यास संबंधितांवर सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक १४.०३.२०२० च्या अधिसूचनेन्वये राज्यात लागू करण्यात आलेल्या साथरोग अधिनियम १८९७ मधील तरतूदीनुसार संबंधित महापालिका आयुक्त, जिल्हाधिकारी , सक्षम प्राधिकारी यांनी कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(डॉ. संजय मुखर्जी )
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
६. मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई
८. प्रधान सचिव , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव , नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव , करोना नियंत्रण कक्ष , मंत्रालय , मुंबई
११.सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२. आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई
१३.आयुक्त , अन्न व औषधे प्रशासन, मुंबई
१४. धर्मदाय आयुक्त,महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. सर्व विभागीय आयुक्त
१६. सर्व जिल्हाधिकारी
१७. सर्व आयुक्त महानगरपालिका
१८. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई
१८ संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
१९ संचालक आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२० सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मुंबई
२१ सर्व मुख्याधिकारी,नगर परिषद,
२२ सर्व जिल्हा शल्य चिकीत्सक
२३.निवडनस्ती (प्रशा - १)